20150423152654652 7

(२०३)

नवीखार डूंगे खारभूमी योजना ता.भिवंडी, जि.ठाणे या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(५३३/२०१०) खारभूमी

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :-२४/०६/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/नवीखार डूंगे /तां-२(१) ८११६, दि.११/११/२०१०

प्रस्तावना :-

नवीखर डूंगे खारभूमी योजना ता.भिवंडी, जि.ठाणे सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास शासन निर्णय दि.१८.५.२००४ अन्वये रु.८०.५९ लक्ष किमतीस पुनःप्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदर अंदाजपत्रक सन २०००-२००१ च्या प्रादेशिक दर सूचीवर आधारित होते. दर सूचीमधील फरक व भाववाढ (गौण खनिजे), संकल्पनातील बदल व इतर कारणाने योजनेच्या किमतीत वाढ झाली असल्याने, सन २००७-२००८ च्या दरावर आधारित रु.१६४.४० लक्ष किमतीचा सुधारित प्रशासकिय मान्यतेचा प्रस्ताव,मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये नवीखार डुंगे खारभूमी योजना ता.भिवंडी, जि.ठाणे या योजनेचे नुतनीकरण कामाची सन २००७-०८ व सा.बां.वि. दरसुची २००८-०९ या वर्षाच्या दरसूचीवर अंदाजपत्रक आधारित आहे. या योजनची अंदाजित किंमत रू.१,६४,४०,१४८/- (रुपये एक कोटी, चौसष्ट लक्ष, चाळीस हजार, एकशे अठ्ठेचाळीस फक्त) प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदार करण्यात येत अहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२)योजनातंर्गत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (४३/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यासह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी,ठाणे
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(५३३/२०१०) खारभूमी दिनांक २४/०६/२०११ चे सहपत्र
नवीखार डुंगे खारभूमी योजना ता.भिवंडी, जि.ठाणे, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रूपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ०.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | १,०९,८८,५८९.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | २६,०७,४८५.०० |
| ५ | 'के' इमारती | १०,०००.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | १०,०००.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | १०,०००.०० |
| ८ | 'पी' देखभाल | ३३,९९०.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | १२,८५,५२५.०० |
| | एकूण | १,४९,४५,५८९.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | १४,९४,५५९.०० |
| | एकूण | १,६४,४०,१४८.०० |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुनःप्रापित क्षेत्र | १२८.०० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १,२८,४३९.०० |
| लाभव्यय गुणोत्तर | २.७३ |